महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) यांना अधीक्षक अभियंता (यांत्रिकी)या पदावर पदोन्नती देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मजीप्रा २०१६/प्र.क्र.२११/पा.पु.२३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ३० मे, २०१७

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक मजीप्रा २०१४/प्र.क्र. ३३ (अ)/पापु-२३, दिनांक २३.३.२०१७
२) अर्धशासकीय पत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक मजीप्रा १११७/प्र.क्र.१२५/पापु-२३, दिनांक २७.४.२०१७
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र. मजीप्रा / अ.अ. (यां)/पदो./ईटी- ४४०/ आ-१, दिनांक २०.१०.२०१६

**शासन आदेश :-**

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. इएसटी १०९७/प्र.क्र. ३७०/पापु- २३, दिनांक ८.२.१९९९ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अभियांत्रिकी संवर्गातील विविध पदांना पाटबंधारे विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले सेवा प्रवेश नियम जसेच्या तसे लागू करण्यात आलेले आहेत.

२. उपरोक्त वाचा क्र. १ मधील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णय दिनांक २३.३.२०१७ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकारी/कर्मचारी यांचे यापुढील वेतन भत्ते व निवृत्ती वेतन राज्य शासनामार्फत अदा करण्यात येणार आहेत.

३. उपरोक्त वाचा क्र. २ मधील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अ.शा.पत्र दिनांक २७.४.२०१७ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील गट 'अ' **व गट** 'ब' (राजपत्रित) अधिकारी/ अभियंते यांच्या सर्व सेवा विषय बाबी शासन स्तरावरुन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत हाताळण्यात येणार आहेत.

४. त्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) या पदावर कार्यरत श्री. के.व्ही. शिंगरू यांना, अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या पदावर पी.बी. -३ वेतन बँड रुपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००/- या वेतनसंरचनेत पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर अधीक्षक अभियंता (यांत्रिकी ) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर खाली दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे .

| क्रमांक | अधिका-याचे नाव | अधीक्षक अभियंता या पदाकरिता रिक्त असलेला प्रवर्ग | कार्यरत असलेले ठिकाण | पदोन्नतीनंतर वाटप केलेला महसुली विभाग | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.के.व्ही.शिंगरु (खुला) | खुला | कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर | नागपूर | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर | रिक्त पदी |

२. श्री. के.व्ही.शिंगरु यांची पदोन्नती पुढील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

अ) सदर पदोन्नती लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

आ) श्री. के.व्ही. शिंगरु यांनी त्यांच्या पदोन्नतीच्या पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. नियुक्तीच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होणे बंधनकारक आहे, याचीही त्यांनी नोंद घ्यावी. तसेच नवीन नियुक्ती ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना कळवावा.

५. सदर शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६०/२०१६/कार्यासन १३, दिनांक १४.१२.२०१६ च्या सहमतीने व नागरी सेवा मंडळ (१) यांनी केलेल्या शिफारशीस सक्षम प्राधिका-यांनी दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२६१३०२५७७०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2017.05.30 13:23:24 +05'30'

**(महेश सावंत)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान मंत्रालय,मुंबई.

२.मा. मंत्री,पा.पु.व स्व. यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.

३.मा.राज्यमंत्री,पा.पु.व स्व.यांचे वि.का.अ.मंत्रालय,मुंबई.

४.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

५.मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई

६.संचालक, वित्त, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई

७.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

८.महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर

९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.

११.अधीक्षक अभियंता (सर्व)(स्थापत्य/यांत्रिकी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

१२.कक्ष अधिकारी(सर्व कार्यासने), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग , मंत्रालय, मुंबई

१३.कक्ष अधिकारी (कार्यासन १३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

१४.कक्ष अधिकारी (व्यय -३), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई ३२

१५.श्री. के.व्ही. शिंगरु ( द्वारा मुख्य प्रशासकीय अधिकारी,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई )

१६.निवडनस्ती ,पापु-२३